## ग. ह. खरे

वाईच्या द्रवीड हायस्कूलमध्ये माध्यमिक इंग्रजी शिक्षण घेत असता मी व माझे सहाध्यायी यांनी संस्कृतमध्ये प्रावीण्य मिळविण्याच्या निमित्ताने आचार्य विनोबा भावे यांजकडे भगवद्‌गीतेचे व काही उपनिषदांचे अध्ययन केले. यामुळे व वाईच्या मोफत वाचनालयातील वर्तमानपत्रे वाचीत असता देशसेवा करण्याचे मनावर काही संस्कार झाले. त्यातच मनुस्मृती, गीतारहस्य इत्यादी ग्रंथांचे पुन्हा पुन्हा वाचन करण्याने ते संस्कार अधिक दृढ झाले. त्याचा परिणाम म्हणून माझे वर्गातील सहाध्यायी व इतर विद्यार्थी यांनी मिळून एक विद्यार्थीमंडळ स्थापन केले. त्या मंडळाने लोकसेवेचा एक भाग म्हणून इ. स. १९१७ ते १९१९ अशी तीन वर्षे वाई येथे गंगापुरी, सिद्धनाथवाडी व न्हावी आळी अशा तीन ठिकाणी रात्रीच्या मोफत शाळा चालविल्या होत्या. त्या वेळचा प्रौढांचा साक्षर बनण्याचा उत्साह ओसंडून जाई. रात्री एक एक वाजेतो दमले भागलेले प्रौढ शिकत बसत. १९२० मध्ये मॅट्रीक झाल्यावर कॉलेज शिक्षणासाठी सांगली येथील विलिंग्डन कॉलेजमध्ये पहिल्या वर्षात असता, महात्मा गांधींची असहकारितेची चळवळ चालू झाली. त्या चळवळीतील एक भाग म्हणजे विद्यार्थ्यांनी शाळाकॉलेजांवर बहिष्कार घालावा असा होता. त्याप्रमाणे अत्यंत श्रेष्ठ दर्जाची देशसेवा करण्याची संधी मिळावी म्हणून किंवा उच्चतम देशसेवा करण्याच्या ध्येयाने प्रेरित होऊन मी कॉलेज सोडले. नंतर देशसेवेचे प्राथमिक शिक्षण घेण्यासाठी अंधेरी येथे नुकत्याच निघालेल्या साधकाश्रमात प्रवेश केला. तेथे अपेक्षा होती तसे शिक्षण मिळाले नाही. कारण तो प्रयोगच नवीन होता. तथापि तेथे श्री. पुंडलीकजी कातगडे यांजसारख्या काही निस्सीम देशसेवकांचा परिचय झाला.

या सुमारास मुळशी धरण प्रकरणी ते धरण होऊ नये अशाविषयी कै. सेनापति बापट यांच्या पुढारीपणाखाली एक मोठी चळवळ चालू होती. मुळशी धरणा-प्रमाणेच कोयना धरणाचीही योजना चालू होती. पाहणी होऊन धरणाचा कच्चा आराखडा व खर्च यांचे अंदाज बांधणे चालू होते. तेव्हा मुळशी धरणाप्रमाणेच कोयना धरणाचे काम झाले तर त्याचे कोणते दुष्परिणाम होतील याविषयी जागृती करण्याचे काम मी माझे दोन मित्र श्री. वि. ना. आपटे व श्री बा. ज. शिंदे यांसह चालू केले होते. मुळशीप्रमाणे सत्याग्रह करावा ही कल्पना त्या वेळी आम्हा

कोणाच्याही डोक्यात नव्हती. धरण केल्यास त्यामुळे जी गावे उठतील त्यांतील रहिवाशांस योग्य ती नुकसानभरपाई मिळावी आणि त्यांचे उचित असे पुनर्वसन व्हावे ही आमची कल्पना होती. त्याप्रमाणे असहकारितेच्या इतर कार्यक्रमांबरोबर हेही काम आम्ही करीत होतो. कोयना धरणाचे क्षेत्र सातारा जिल्ह्यातील जावळी व पाटण या दोन तालुक्यांत होते. दोन्ही तालुक्यांत एकाच प्रकारची चळवळ चालू होती. पैकी जावळी तालुक्यातील सरकारी अधिकाऱ्यांनी आमच्या विरुद्ध कोणतीही हालचाल केली नाही. पण पाटणचे मामलेदार श्री. दुदुसकर हे आवश्यकतेपेक्षाही अधिक सरकारनिष्ठ होते. शिवाय ते ब्राह्मण-ब्राह्मणेतर वादाने पछाडले होते, अशी तत्कालीन सर्वसामान्य सुशिक्षित समाजाची समजूत होती. 'तुम्ही आवश्यक त्या कर्तव्यापेक्षाही अधिक सरकारनिष्ठा दाखविता' असे मी त्यांस एकदा स्पष्टपणे सुनावलेही होते. आमच्या भाषणांच्या योगाने कोयना खोऱ्यातील रहिवासी भयभीत होऊन अशांतता माजत आहे, अशा आरोपाखाली त्यांनी मी व श्री. आपटे या दोघांवर क्रि. प्रो. कोडच्या १०७ कलमाखाली एक वर्ष जामीनकीचे खटले भरले. असहकारतेच्या तत्कालीन नियमांप्रमाणे मी जामीन देण्याचे नाकारल्याने माझी कारागृहात एक वर्ष रवानगी झाली.

मी १२ ऑगस्ट १९२२ रोजी कारागृहात गेलो आणि माझी शिक्षा साधी असल्याने व शिक्षेत कोणतीही सवलत न मिळाल्याने ११ ऑगस्ट १९२३ रोजी सुटलो. या बारा महिने शिक्षेपैकी दोन महिने मी विसापूर येथील तुरुंगात काढले व उरलेले दहा महिने पुणे येथील येरवडा तुरुंगात घालविले. त्या वेळचा विसापूरचा तुरुंग म्हणजे नरकच होता. तेथे माणसे व जनावरे यांत कोणताही फरक करीत नसत. सर्व कैदी साखळीने जनावराप्रमाणे बांधले जात. तेथे जनावरांनी करावयाची कामे माणसांकडून करवून घेत. उदा. मोटांनी पाणी काढण्याचे काम कैद्यांनाच करावे लागे. कडक बेड्या व अशा तऱ्हेची कामे यामुळे कैद्यांच्या पायांना व हातांना जखमांचे तकदे पडत. पण तेथील अधिकाऱ्यांना त्याची कोणतीच पर्वा नसे. अन्नामध्ये किती किडे-मकोडे असत याची गणतीच नाही. भाजी किंवा आमटी यावर आलेल्या तवंगात ते डोळ्यांना सहज दिसत असत. जेथे झोपावयाचे तेथेच मलमूत्र विसर्जनासाठी लहान लहान टिपे ठेवलेली असत. त्या टिपापाशी जावयाचे म्हणजे आपल्या दोन्ही बाजूंच्या पाच सात जणांच्या पायातील साखळदंड ओढून जावे लागे. यामुळे एका कैद्याच्या मलमूत्र विसर्जनापायी पाच सात कैद्यांची तरी झोपमोड होई. त्या टिपातील घाण कैद्याच्या अंगावरही उडे. तरीही आठ दिवसांत देखील कैद्याला स्नान करण्याची व्यवस्था नसे. विसापूर तुरुंगाचे इ. १९२२ चे कागदपत्र इत्यादी पाहिले तर त्यांत किती कैदी आजारी पडत व किती मरून जात याविषयी लख्ख उजेड पडेल. पृथ्वीवरचा तो नरकच होता. माझ्या तेथील दोन महिन्यांच्या वास्तव्यात माझे आठ पौंड वजन उतरले. त्यामानाने येरवड्याची

व्यवस्था काही तरी बरी होती. पण इ. स. १९२२–२३ मध्ये असलेला येरवड्याचा जेल सुपरिटेंडेंट मेजर जोन्स हा अतिशय खाष्ट माणूस होता. मुळशीत सत्याग्रह करून तुरुंगात आलेल्या कोवळ्या मुलांनाही तो अठ्ठावीस पौंड दळण दळावयास लावी आणि ते न झाले तर क्रमाने तीस फटक्यांपर्यंतच्या शिक्षाही देई. कै. शंकरराव देव हेही फटक्यांच्या शिक्षेतून सुटले नव्हते. इतके करूनही सत्याग्रही काम करीत नाहीत म्हणून मेजर जोन्स सेनापति बापटांकडे तक्रार करी. कै. बापट रागाने लाल होत. तथापि यांनीच आपल्या तुरुंगातून बाहेर पाठविलेल्या कवितांत म्हटल्याप्रमाणे ' कसाही छळो वैरी कारागृहात । मनीच्या मनी आमुचा क्रोध जावू ॥ ' याप्रमाणे ते शांत राहात; पण मग मेजर जोन्सशी एक शब्दही बोलत नसत. तेथे माझा कै. सेनापति बापट, श्री. पां. वा. गाडगीळ, भुसावळचे दास्ताने, चिंचवडचे कै. घारे इत्यादी अनेकांशी दृढ परिचय झाला. श्री. पां. वा. गाडगीळ यांना तर कित्येक दिवस कांजी रोटी, आडाबेडी, दंडाबेडी, हातकडी इ. शिक्षा भोगताना मी पाहिले आहे.

माझी शिक्षा साधी असल्याने मला येरवड्यात वाचन करण्यास भरपूर वेळ मिळाला. त्या वेळी मी मुख्यत: स्वामी विवेकानंदांचे मायावती आवृत्तीमध्ये प्रसिद्ध झालेले वाङ्मय, ज्ञानेश्वरी, तुकारामगाथा, गीतारहस्य, तुलसीदास रामायण इत्यादी ग्रंथांची अनेक पारायणे केली. त्यामुळे मला हिंदी बरेचसे समजू लागले. तुरुंगात साधी शिक्षा झालेल्या कैद्यांना स्वत:चे कपडे सामान्यत: वापरण्यास देतात. मी दोनदा मागूनही अंथरण्यापांघरण्याचे कपडे मला दिले नाहीत. माझ्या स्वत:च्या एक जुनी व एक नवी अशा दोन घोंगड्या कसरीने उण्याअधिक खाल्ल्या होत्या. मी त्या घेण्याचे शेवटच्या दिवशी नाकारले. तेव्हा मला एका घोंगडीची किंमत मिळाली. चोराच्या हातची लंगोटी समजून मी ती स्वीकारून तुरुंग सोडला. येरवड्यातील व्यवस्थेचा माझी साधी शिक्षा असल्याने माझ्या प्रकृतीवर चांगला परिणाम झाला मी तुरुंगातून सुटल्यावर माझी प्रकृती तुरुंगात जाण्यापूर्वीच्या तुलनेने अधिक चांगली झाली होती असे माझ्या आईला वाटले. तुरुंगातून सुटल्या-वर सुमारे एक वर्षभर सातारा जिल्हा काँग्रेस कमिटीचा एक चिटणीस म्हणून मी काम केले. कारावासापूर्वी मी अपरिग्रहवृत्तीने प्रसंगी भिक्षा किंवा मधुकरी मागून राही. पैकी सहा महिने तर पैशास न शिवताही काढले.

या चार वर्षांच्या माझ्या कामातून मी काढलेले निष्कर्ष असे :

(१) त्या वेळी स्पृश्यास्पृश्य चळवळ गंभीर स्वरूपामध्ये चालू नव्हती. पण ब्राह्मण-ब्राह्मणेत्तर चळवळीने पुष्कळच उग्र स्वरूप धारण केले होते. त्या चळवळीचा परिणाम असा होणार की, ब्राह्मणांनी केलेल्या नि:स्वार्थ सेवेला मान्यता न मिळता स्वार्थी बुद्धीने ब्राह्मणेतरांनी केलेल्या चळवळीलाच महत्त्व चढणार; आणि हळूहळू का होईना पण सत्तेतून ब्राह्मण वर्गाचे सामान्यत: उच्चाटन होणार, नि:स्वार्थ

बुद्धीने केलेल्या सेवेला आत्मसंतोषाशिवाय दुसरे कोणतेही फळ मिळणार नाही. तेव्हा आपणास मरून कीर्तिरूपाने उरावयाचे असेल तर वारांगनेप्रमाणे असणाऱ्या नृपनीतीपासून आपण आपली फारकत करून घेतली पाहिजे आणि ज्ञानदीप लावण्याच्या मागे लागले पाहिजे. विशेषत: ज्या ज्ञानात महाराष्ट्रात तरी स्पर्धा नाही अशा ज्ञानक्षेत्रात शिरले पाहिजे.

(२) स्वातंत्र्यासाठी तारक (रचनात्मक) व मारक (विनाशात्मक) कार्य केले पाहिजे असे माझे मत होते. विधिमंडळात व मंडळाबाहेर दोन्हीकडे चळवळी झाल्या पाहिजेत असे मला वाटे. पण कॉंग्रेस समित्या सामान्यत: या तत्त्वाविरुद्ध म्हणजे तत्कालीन शब्दात नाफेरवादी होत्या. या वादात मला मनाविरुद्ध वागण्याचा प्रसंग येई ते मला नको होते.

(३) कोणाही कार्यकर्त्याला भरीव कार्य करावयाचे असेल तर त्याने पैशाला न शिवण्याचे व्रत घेऊ नये. त्याने यथालाभावर संतुष्ट राहण्याचे ध्येय ठेवावे.

हे व इतर कित्येक मुद्दे लक्षात आल्यावर मी राजकारणात सक्रिय भाग घेण्याचे सोडून दिले. त्याच वेळी कर्मधर्मसंयोगाने साताऱ्याच्या राष्ट्रीय शाळेत शिक्षक म्हणून येता का असे मला विचारले. राष्ट्रीय शाळेत वेतन अगदी थोडे होते हे मला माहीत होते. तेथे दरमहा बीस रु. वेतन व शाळेपाशी देण्यासारखे पैसे असतील तर वर्षाच्या शेवटी एकशे वीस रु. प्रत्येकाने घ्यावयाचे असा संकेत. हे सर्व लक्षात घेऊन मी इ. स. १९२४च्या दुसऱ्या सहामाहीपासून राष्ट्रीय शाळेची सेवा पत्करली व माझ्या मगदुराप्रमाणे मी तिची सेवाही केली. वरील पद्धतीने प्रत्येक शिक्षकाला जे पैसे मिळण्यासारखे होते ते मला मिळाले. पण राष्ट्रीय शाळेत येणाऱ्या विद्यार्थ्यांचा दर्जा हळूहळू उतरू लागला. बुद्धीने कमी व अवगुणी विद्यार्थी शाळेत अधिकाधिक येऊ लागले. त्यांना तयार करणे म्हणजे दगडावर डोके आपटण्यासारखेच होते. तेव्हा इ. स. १९२९च्या आरंभी मी ती शाळा सोडली. इतरांनी ती शाळा सोडली नाही. याचे एक कारण प्रत्येकाने पैसे अधिक मिळविण्याच्या दृष्टीने साताऱ्यास काही धंदे सुरू केले होते. माझा तसा जोडधंदा काहीच नव्हता. यामुळे मला ती शाळा सोडणे सोपे गेले.

त्या शाळेत शिक्षक म्हणून काम करीत असता मी कोयना धरणाची चळवळ चालू ठेवली होती. तीबाबत १९२९च्या एप्रिल महिन्यात आम्ही साऱ्या कोयना खोऱ्याची एक जंगी सभा भरविली. तीत आमच्या मागण्या आम्ही एकमुखाने मांडल्या. परिणामी लोकांचे मत विचारात घेतल्याशिवाय काही करणार नाही असे सरकारी पत्रक निघाले. त्या बाबतीतील माझे इ. स. १९२३–२४ चे एक पत्र, पुण्यातील तत्कालीन मुळशीचे एक कार्यकर्ते कै. भुस्कुटे यांच्या झडतीत सापडले. त्यावरून पोलिसांनी दंश धरून मी साताऱ्यात घरांना आगी लावतो या आरोपाखाली इ. स. १९२५ मध्ये मला पकडून नेले होते. वास्तविक त्या वेळी साताऱ्यात

एकही आग लागली नव्हती. पण पोलिस खात्यात काही कपात चालू होती. त्यामुळे काही पोलिसांची नोकरी जाणार होती: ती जाऊ नये म्हणून शिपायांनी घरे जाळणाऱ्या मनुष्याची हूल उठविली. मला अटक करून पोलीस सुपरिंटेंडंटकडे घेऊन गेले. सामान्य लोक हुलीवर विश्वास ठेवणारे असतात. यामुळे आगी लावणारा सापडला असे समजताच सुमारे २०० लोक माझ्या पाठीमागे लागले. मला थोडासा मारही खावा लागला, पण मला पोलिस सुपरिंटेंडंटपुढे उभे करतात न करतात तोच साताऱ्चे एक प्रमुख नागरिक कै. वाग्भट देशपांडे तेथे आले आणि त्यांनी पोलीस सुपरिंटेंडंटला ' हे काय चालले आहे ' म्हणून विचारले. त्याबरोबर पोलिसांचा पाजीपणा सुपरिंटेंडंटच्या लक्षात आला. त्याने मला पकडून आणणाऱ्या पोलिसाला चार-दोन शिव्या हासडल्या आणि मला सोडून दिले.

मी राष्ट्रीय शाळेत असताना अभ्यासाबाबत माझी अतृप्त इच्छा होती ती पूर्ण करण्याच्या विचारास लागलो. असहकारितेमध्ये कॉलेज सोडल्यानंतर पुन्हा कॉलेज-मध्ये जाणे हे चंचल विचाराचे द्योतक झाले असते. सरकारी नोकरी करण्याची माझी मन:स्थिती कधीच नव्हती. शिवाय कॉलेजमध्ये जाऊन पुन्हा शिक्षण चालू करण्यासारखी माझी आर्थिक परिस्थितीही अजिबात नव्हती. यामुळे पुढील शिक्षण पुण्याच्या राष्ट्रीय टिळक महाविद्यालयात घेणेही अशक्यच होते. पण लहानपणा-पासून जडलेली सतत अभ्यासाची सवय आणि इच्छा मला स्वस्थ बसू देईना. तेव्हा त्यातल्या त्यात बरा वाटणारा, आवडीचा व प्राप्त परिस्थितीत साधू शकणारा असा इतिहास हा विषय मी अभ्यासासाठी निवडला आणि सातारा येथील वास्तव्यात भा. इ. सं. मंडळाची प्रकाशने, राजवाडे खंड, कै. वासुदेवशास्त्री खरे यांचे ऐतिहासिक लेख संग्रहाचे खंड इत्यादींपैकी मिळतील ती सर्व पुस्तके मी वाचून काढली व त्यांची टिपणेही केली. हे करीत असता माझ्या असे प्रत्ययास आले की खरे, राजवाडे, इत्यादी पूर्वसूरींनी जे व जसे काम केले तसे आपणही करू शकू; पण त्यासाठी काही पूर्वतयारी केली पाहिजे. त्यापैकी एक भाग म्हणजे गावोगाव पडलेल्या शिलालेखांचे ठसे घेणे आणि त्यांचे वाचन करणे. याचा दुसरा भाग म्हणजे जुने मराठी मोडी कागद जमविणे, वाचणे व प्रकाशित करणे. तिसरा भाग म्हणजे फार्सी, कानडी इत्यादी भाषा शिकून त्यांतील साधने जमविणे, त्यांचा अभ्यास करणे व ती प्रकाशित करणे. तसे करताना नव्याने मिळालेल्या साधनांच्या योगाने जुन्या इतिहासज्ञानात कोणती भर पडते किंवा उणेपणा येतो अगर अन्य बदल होतो हे दाखविणे आणि चवथा भाग म्हणजे संकलन स्वरूपाचे लेख व पुस्तके प्रकाशित करणे. यापैकी शिलालेखांचे ठसे घेण्याचे काम थोड्याशा प्रयासाने बरेचसे जमू लागले; पण त्यांचे वाचन करणे हे इतके सोपे नव्हते. आपल्या भारतात आज ज्या भारतीय आर्य व द्राविडी लिपी चालू आहेत, त्या सर्वांचे मूळ अशोकी ब्राह्मी लिपीत आहे हे ज्ञानकोशाच्या वाचनाने माझ्या लक्षात आले होते

५

पण त्या अशोकी लिपीचे स्वतःच अध्ययन करावयाचे तर त्या लिपीतील लेख व त्या लेखांचे नागरीत वर्णांतर असे एखादे पुस्तक पाहिजे होते. माझ्या सुदैवाने त्या वेळी सातार्‍यात श्री सदाशिवराव बखले नावाचे विद्वान वकील राहावयास आले होते. त्यांचा या विषयाचा व्यासंगही होता. ज्ञानकोशावरून मी ब्राह्मी लिपीची घडण कशी आहे हे समजावून घेतले होते. श्री. बखले यांनी त्या वेळी अशोकी लेखांचे पुस्तक अभ्यासासाठी आणले होते (हयूल्श संपादित कॉर्पस् इन्स्क्रिप्शनम् इंडिकेरम खंड १). हे पुस्तक मी त्यांजकडे मागितले. माझा त्यातील हेतूही मी त्यांना सांगितला. त्या वेळी तो त्यांना तितकासा पटला नव्हता; तरी त्यांनी तो ग्रंथ मला अभ्यासावयास दिला. मी सुमारे महिनाभर श्रम करून त्या ग्रंथात दिलेल्या ठशांच्या व पाठांच्या साहाय्याने सर्व अशोकी लेख वाचून व लिहून काढले. त्यामुळे माझी ब्राह्मी लिपी पक्की घटली.

पूर्वतयारीचा दुसरा भाग मोडी कागदपत्रांचे वाचन. मी मोडीची पहिली तीन पुस्तके शाळेत वाचली असल्याने मोडी कागद वाचणे एवढे अवघड गेले नाही. तसे पाहिले तर पेशवाईतील मोडी कागद वाचणे फारसे अवघड नसते. पण शिवकालीन व शिवपूर्वकालीन मोडी कागद वाचणे चार सहा महिन्यांच्या स्वतंत्र अभ्यासाशिवाय चांगले जमत नाही; पण पुण्यास आल्यावर तेही सारे जमले. पूर्वतयारीचा तिसरा भाग म्हणजे फार्सी, कानडी इ. शिकणे व वाचणे. हे मात्र इतके सहज जमण्यासारखे नव्हते. मला उर्दू लिपीचे साधारण ज्ञान एका मुसलमान मित्राच्या साहाय्याने माध्यमिक शिक्षण घेत असताच झाले होते त्याच्या साहाय्याने प्रथम उर्दू भाषेचे ज्ञान करून घेण्याच्या प्रयत्नास मी लागलो. त्या वेळी सातारा येथे मी ज्या घरात बिऱ्हाडास होतो त्या घरात माझ्या सुदैवाने मोजणी खात्यातील एक मामलेदार राहावयास आले होते. त्यांना उर्दू मजपेक्षा थोडे अधिक वाचता येत होते. तेव्हा त्यांनी व मी मिळून उर्दूची चार पुस्तके वाचली. त्यायोगे मला उर्दू वाचता येऊ लागले व तुरुंगात असता केलेल्या हिंदी भाषेच्या अभ्यासाने अर्थही समजू लागला.

एवढी सर्व पूर्वतयारी मी सातारा येथे माझ्या साडेचार वर्षांच्या वास्तव्यात केली. तथापि या तयारीचा उपयोग करून काही अधिक अभ्यास करावयाचा तर त्यास सातारा हे गाव निरुपयोगीच होते. पुण्या-मुंबईसारख्या ठिकाणी त्यासाठी कायमचे वास्तव्य करणे आवश्यक होते. पण हे जुळावे कसे ? पुण्यामध्ये त्या वेळी माझे काही नातेवाईक व मित्र होते. पैकी राजकीय चळवळीमुळे त्यापैकी कै. शं. ना. जोशी, वाईकर यांची व माझी थोडीशी ओळख होती. त्यांना एक पत्र लिहून पुण्यात मी आल्यास माझी राहण्याची, निर्वाहाची व अभ्यासाची काही सोय होईल का हे विचारले. त्यांचे निश्चयात्मक नव्हे, पण प्रोत्साहनपर पत्र आले; तेव्हा मी सातारा सोडून पुण्यास येण्याचा निश्चय केला. त्याप्रमाणे इ. स. १९२९ च्या

जानेवारीत पुण्यास आलो. साताऱ्यास मी, माझी आई व दोन भाऊ असे राहात होतो. त्यांपैकी माझा एक भाऊ सुतारकाम करून काही पैसे मिळवू लागला होता. मी त्या कामात त्यास शाळेतर्फे सहाय्य करीत होतो. मी पुण्यास आलो त्यामुळे साताऱ्याचे बिऱ्हाड हलवणे भागच होते. तेव्हा प्रथम मी व माझा एक धाकटा भाऊ पुण्यास आलो व कुटुंबातील आई वगैरे मंडळी कधी वाईस तर कधी मुंबईस माझ्या थोरल्या भावाकडे राहू लागली. सातारा सोडताना मजपाशी सारे शंभर रुपये होते आणि शाळेकडून शंभर रुपये यावयाचे होते. ते पुढे योग्य वेळी मजकडे आले; पण पुण्यास आल्यावर रहिवास, भोजन व अभ्यास यांचा प्रश्न कसा सोडवायचा ही अडचण मजपुढे आली. कै. जोशी यांच्या पत्रात काही द्रव्योत्पादक काम मिळू शकेल असे होते; पण अपेक्षेप्रमाणे तसे द्रव्योत्पादक काम मिळणे कठिण झाले. पण अभ्यास चालू ठेवावयाचा तर पुण्यास गाडून राहणे आवश्यकच होते. तो प्रश्न मी सोडविला तो असा. दिवसभर भा. इ. सं. मंडळात अभ्यास आणि मिळाल्यास द्रव्योत्पादक काम करावयाचे; आनंदाश्रमात जाऊन आंघोळ करावयाची आणि एका मित्राकडे घेऊन ठेवलेले दीड पावशेर दूध व बाजारातून आणलेला दोन पैशांचा पाव याचा फराळ करावयाचा आणि पुन्हा अभ्यास किंवा द्रव्योत्पादक काम यास लागावयाचे. रात्री थंडा फराळ करून आनंदाश्रमात किंवा मंडळात झोपायचे. असे सुमारे सहा महिने मी काढले; तरीही पुण्यास जम बसण्याचे चिन्ह दिसेना.

त्या वेळी पुण्यास भारत इतिहास संशोधक मंडळात एक योजना म्हणून शिवचरित्रकार्यालयाचे काम सुरू झाले होते. त्यासाठी त्या कार्यालयाने काही पैसे जमविले होते. त्यात मलाही काही द्रव्योत्पादक काम मिळेल अशा कल्पनेने कै. शं. ना. जोशी यांनी मला पुण्यास बोलविले होते. त्यांची कल्पना अगदीच चुकीची होती असे नाही. कै. कृ. वा. पुरंदरे मास्तर हे या कार्यालयात २५ ते ५० रु. घेऊन काम करीत होते. ते इतिहास विषयातील बरेच जाणकार होते; ते शिवचरित्र कार्यालयाचे काम सोडून जातील अशी समजूत होती; पण त्यांनी तसे केले नाही; यामुळे मला शिवचरित्रकार्यालयात ताबडतोब काम मिळू शकले नाही. तेव्हा माझे पुण्यातील वास्तव्याचे पहिले सहा महिने काही किरकोळ द्रव्योत्पादक कामे व अभ्यास यात गेले. या सहा महिन्यांत जंत्री लिहिण्याचे ५० रु. (हे काम मजकरता माझ्या धाकट्या भावाने केले), ब्रह्मनाळ येथील कागद वाचून नकला करण्यासाठी जेवणासह १० रु.; एक बखर नकलण्याबद्दल १५ रु. आणि हलगंडीकर देसायांच्या छापील फार्सी कागदांचे मराठीत लिप्यंतर करण्याचे सुमारे २५ ते ३० रु. असे मिळून अदमासे १०० रु. मला मिळाले. एवढ्या थोड्या पैशात एका भावासह स्वतंत्रतेने बिऱ्हाड करून पुण्यात राहणे शक्यच नव्हते. त्याच वेळी सातारा जिल्हा कॉंग्रेस कमिटी दरमहा ४० रु. वर जिल्हा प्रचारक म्हणून काम करण्यास बोलावीत

होती. येथे जम नीट बसण्याचा रंग दिसेना; म्हणून मी साताऱ्यास परत जाण्याचे ठरविलेही होते; पण याच वेळी दुसरी एक घटना घडल्यामुळे मला पुण्यास राहता आले. इ. १९२९ च्या जून-जुलैमध्ये पुण्यास कै. जदुनाथ सरकार व कै. गो. स. सरदेसाई यांच्या प्रयत्नाने पेशवे दप्तर तपासण्याचे काम सुरू झाले. तेथे गेल्यास कै. पुरंदरे मास्तर यास ५० ते ६५ रु. मिळणार होते. येथे त्यांस फक्त २५ ते ५० रु. मिळत होते. तेव्हा त्यांनी शिवचरित्रकार्यालयाचे काम सोडून पेशवे दप्तरात नोकरी धरली. शिवचरित्रकार्यालयाला यामुळे एका मनुष्याची गरज नव्याने उत्पन्न झाली. मी येथे बेकार स्थितीत होतोच. मला त्या कार्यालयाने २५ रु. घेऊन काम कराल का म्हणून विचारले. मी त्याना ४० रु. तरी द्या म्हणून म्हटले. ते त्यास प्रथम तयार झाले नाहीत. तेव्हा मी २५ रुपये घेऊन दोन महिने काम केले.

मी चाळीस रुपयांची मागणी चालूच ठेवली होती. शेवटी निक्षून सांगितले की, चाळीस रुपये देत नसाल तर मी पुणे सोडून पुन्हा साताऱ्यास जातो. मला २५ रु.त बिऱ्हाड करून राहणे शक्य नाही. शेवटी एक दिवस कै. दत्तोपंत आपटे व माझी अभ्यासचर्चात्मक बैठक झाल्यावर त्यांस काय वाटले कोणास ठाऊक; पण त्यांनी दरमहा चाळीस रुपये देऊ केले; येवढेच नव्हे तर पाठीमागील दोन महिन्यांच्या पगारापोटी मला दिलेल्या २५ रुपयातदेखील १५ रु. वाढ करून मागील दोन महिन्यांचे उरलेले तीस रुपयेसुद्धा मला दिले. हे चाळीस रुपये वेतन सुमारे एक वर्ष चालले. मी ब्राह्म्यादि लिपी व फार्सी भाषालिपी यांचे बऱ्यापैकी ज्ञान मिळविल्याचे लक्षात आल्यावर मंडळाने इ. १९३०मध्ये मला समाधानाने शिवचरित्रकार्यालयातून भा. इ. सं. मंडळाच्या सेवेत घेतले व कै. शं. ना. जोशी यांचेप्रमाणे मला वेतनापोटी ५० रु. मिळू लागले. शिवाय मी मंडळातच राहावयास आलो.

पहिल्या वर्षी मी येथे आल्यावर सेवेच्या व्यतिरिक्त इतर वेळात फार्सीच्या अभ्यासावर लक्ष केंद्रित केले. त्याचे एक कारण म्हणजे, त्या वेळी मंडळात फार्सी जाणणारा व संशोधन करणारा प्राय: कोणी नव्हता. कै. गं. ना. उपाख्य आबासाहेब मुजुमदार यांना थोडेबहुत फार्सी येत होते; पण इतर अनेक कामांमुळे त्यांना फार्सीचा अधिक अभ्यास करणे शक्य होत नव्हते. मला तर येथे गाडून अभ्यास करीत राहावयाचे होते. पोटासाठी पैसेही मिळवावयाचे होते आणि त्यासाठी स्वतंत्र काम करावे लागत होते. यामुळे मी फार्सीच्या अध्ययनावर जोर दिला. त्या वेळी पै. अब्दुल अझीझ मुनशी नावाचे एक गृहस्थ मंडळात असलेल्या फार्सी कागदांच्या नकला करण्याचे काम करीत होते. ते आपणास फार्सी शिकवितील का याची चाचपणी घेतली. मी त्यांचे अध्यापन पैशाच्या अभावी मोफत मिळविण्याच्या प्रयत्नात होतो. पण त्यांनी प्रसंग पाहून 'Don't kill my time' असे सांगून माझी बोळवण केली. मग मला स्वत:च अभ्यास करण्याशिवाय अन्य मार्ग उरला

नाही. तेव्हा मी स्वतःच स्वतःचा गुरू झालो व आपला आपणच अभ्यास करू लागलो. त्यासाठी मी जी पद्धत अवलंबिली ती अशी : (१) फार्सीचे व्याकरण अतिशय सोपे असल्याने 'पर्शियन ग्रामर फॉर बिगिनर्स' या पुस्तकाची रोज एकदा आवृत्ती करू लागलो. त्यासाठी व्याकरणाचे काही तक्ते तयार केले व त्यांचेही रोज अवलोकन करू लागलो. त्यामुळे मला व्याकरण समजले. पण फार्सीचे व्याकरण जितके सोपे त्यापेक्षा फार्सी छापील ग्रंथांचे सोच्चार वाचन करणे कित्येक पट अवघड आणि हस्तलिखितांचे वाचन करणे तर त्याहून शेकडो पटींनी कठीण. तेव्हा फार्सीच्या प्राथमिक पुस्तकांच्या मी ५० ते १०० आवृत्त्या केल्या. त्यात मुख्यत: हिकायत-इ-लतीफ, हिकायत-इ-युसुफ, सद् हिकायत व हाजिब-इ-शाही या मालेचे चौथे किंवा मॅट्रिकला नेमलेले पुस्तक यांचा समावेश होता. एवढे केल्यावर मी मंडळातील मुन्शीच शिक्षक असलेल्या मुलांच्या माध्यमिक भावे स्कूलमध्ये फार्सीच्या वर्गात त्या वेळचे त्या हायस्कूलचे प्रमुख श्री. मालशे ह्यांच्या परवानगीने जाऊन बसू लागलो. उपर्युक्त मुन्शी तेथेही नीट शिकवीत होते असे नाही; पण ते जे काही शिकवितील ते श्रोता म्हणून ऐकण्याची संधी मला मिळाली. त्याचाही मी शक्य तितका लाभ घेतला. शिवचरित्रकार्यालयातील सेवा करून उरलेल्या वेळात अभ्यास करण्याचा माझा क्रम इ. १९२९ जून ते १९३० जूनपर्यंत असा अव्याहत चालू होता.

याच कालांत मी आणखी एक उद्योग केला. तो म्हणजे ब्राह्मीतून उत्पन्न झालेल्या काही भारतीय लिप्यांवर प्रभुत्व मिळविले. माझ्या सुदैवाने या कालातच शक ६६४ चा बदामी चालुक्य, दुसरा विक्रमादित्य याचा ब्राह्मी-कानडी लिपीतील ताम्रपट मंडळाकडे आला. त्यावर लक्ष केंद्रित करून मी तो वाचून काढला व त्यावर मंडळ संमेलनात लेख वाचला. तोच अभ्यास पुढे वाढवून मी मुस्लिमपूर्व संस्कृत, कानडी, मराठी ताम्रशिलाशासनांचे तीन खंड मंडळ ग्रंथ म्हणून प्रकाशित केले. या विषयांतील माझे आजवरचे इंग्रजी-मराठी लेखन अदमासे पाचशे पृष्ठांचे सहज असेल.

मी फार्सीचा प्रारंभिक अभ्यास कसा केला हे आधी सांगितले. इ. १९३० साली मंडळाच्या लक्षात आले की, फार्सीचे ध्यानात घेण्याएवढे ज्ञान मी संपादन केले आहे. तेव्हा मंडळानेच मला तुम्ही व मुन्शी मिळून काम करीत जा म्हणून सांगितले. तेव्हापासून वीस वर्षे रोजी सुमारे एक तास बसून ते व मी मिळून फार्सी कागदपत्रांच्या नकला करण्याचे काम करीत राहिलो. यामुळे फार्सी हस्तलिखित कागदपत्रांचे वाचन करणे – पुष्कळ अवघड असले तरी – यात माझी बऱ्यापैकी तयारी झाली. या ज्ञानाच्या सहाय्याने व काही मित्रांची मदत घेऊन मी फार्सी साधनांची सुमारे एक हजार पृष्ठे आजवर प्रकाशित केली.

उच्चस्तरीय फार्सीवर अरबीचा फार मोठा प्रभाव पडला आहे. तेव्हा फार्सीत

प्रावीण्य मिळविण्यासाठी अरबीचे एका विशिष्ट मर्यादेपर्यंतचे म्हणजे निदान शब्दसिद्धी, वचनत्रय, अव्ययें, विभक्ती व लिंगविचार एवढ्या विषयांचे ज्ञान असणे आवश्यक आहे. तेव्हा त्याचाही प्रयत्न केला व त्यात बरेच यश मिळविले. पण पुढे वाटू लागले की, भांडवल जमविण्यातच आयुष्य खर्ची पडू लागले तर त्या भांडवलाच्या आधाराने व्यापार करून कमाई केव्हा करावयाची? म्हणून तिचा अधिक अभ्यास करण्याचे सोडून दिले. मी अभ्यासाच्या पूर्वतयारीच्या दृष्टीने आणखी एक प्रयत्न केला तो म्हणजे कानडीचे अध्ययन. महाराष्ट्राच्या इतिहासाची साधने मराठी, हिंदी, संस्कृत, फार्सी, कानडी, इंग्रजी, फ्रेंच, डच, पोर्तुगीज इत्यादी भाषांत आहेत. महाराष्ट्राच्या इतिहासाचा पायाशुद्ध अभ्यास करावयाचा तर त्यासाठी या सर्व भाषांचे ज्ञान असणे अगदी अनिवार्य आहे. त्यांपैकी संस्कृत, मराठी, हिंदी, इंग्रजी, उर्दू, फार्सी, एवढ्या भाषा मला अवगत झाल्या होत्या. पण उरलेल्यांपैकी कानडी भाषेच्या ज्ञानाची आवश्यकता मला अधिक वाटली म्हणून मी कानडीचा अभ्यास चालू केला. प्रारंभिक ज्ञान स्वतःच मिळविले. पण अधिक ज्ञानासाठी एका शिक्षकाकडे अध्ययन केले. शिवाय कानडी नियतकालिके–वर्तमानपत्रे वाचण्याचाही सराव चालू केला. याचे फलित एवढे की, पुस्तकांवरून शिकल्याने बोलता येत नसले तरी मला कानडी बरेचसे समजू लागले व प्राचीन कानडीतील (हळे कन्नडमधील) काही शिलालेख मी संपादितही केले.

हा अभ्यास चालू असता माझ्या हेही लक्षात आले की, कै. का. ना. साने, वा. वा. खरे, वि. का. राजवाडे इत्यादी व्यक्तींनी शेकडो ठिकाणी जाऊन समकालीन कागदपत्र जमविण्याचा आटोकाट प्रयत्न केला असला तरी फार्सीच्या अज्ञानामुळे त्यांना फार्सी कागद तसेच सोडून द्यावे लागले. वस्तुतः त्यांच्या हे ध्यानात आले असलेच पाहिजे की, मराठ्यांच्या पायाशुद्ध इतिहासाला उपयोगी पडणारी फार्सी साधने मराठीइतकीच महत्त्वाची आहेत. त्यांची संख्याही मराठीइतकीच आहे. तथापि यांपैकी कोणीही फार्सी साधने जमविण्याचा फारसा प्रयत्न केला नाही. याचा परिणाम असा झाला की, त्यांच्या कालात जी फार्सी साधने सहज उपलब्ध होती, विशेषतः गावोगाव व घरोघर जाऊन जी साधने सहज मिळण्यासारखी होती, ती त्यांना फार्सीच्या अज्ञानामुळे जमविता आली नाहीत. त्यांना जी साधने त्यांच्या कालात मिळविता आली असती त्यांपैकी निम्मी साधने तरी आता कायमची नष्ट झाली आहेत. माझ्या फार्सीच्या ज्ञानामुळे अशी अनेक साधने मी जमवू शकलो.

हे करीत असताना माझ्या आणखी एक लक्षात आले ते हे की, कै. रा. ब. का. ना. साने यांच्या वेळेपासून जरी मराठी साधने जमविण्याचा प्रयत्न झाला होता तरी तो पद्धतशीर झाला नव्हता. शिवाय तत्कालीन लोक, जवळ जुने कागदपत्र असताही संशोधकांना उत्साहाने दाखवीत नसत. यामुळे आपाततः जे कागद जमले

ते खरे, राजवाडे, भा. इ. सं. मंडळ यांनी प्रकाशित केले. मी मराठी कागदाविषयीही अधिक पद्धतशीर प्रयत्न केला अशी माझी समजूत आहे. उदा० कै. राजवाडे यांनी मराठ्यांचे दिल्लीचे वकील हिंगणे यांजकडील काही कागद आपल्या सहाव्या खंडात प्रकाशित केले. ते त्यांना कोठून मिळाले ते त्यांनी कोठेही सांगितलेले नाही; पण मी नाशिक जिल्ह्यापैकी हिंगण्यांचे इनामगाव चांदोरी येथे तीन वेळा जाऊन, एकूण पंधरा दिवस तेथे राहून व तिसऱ्या मजल्यावरील माती व कौलांचे तुकडे यांनी भरलेला सुमारे दोन गाड्या कागद–गळाठा तपासून त्यांतील निवडक कागदांचे दोन खंड प्रकाशित केले, आणि एका खंडाची सामग्री अजून भा. इ. सं. मंडळात प्रकाशनाची वाट पाहत आहे. पुन्हा एकदा चांदोरीच्या हिंगण्यांकडे गेलो तर आणखी एखाद्या खंडाची सामग्री मिळण्याची शक्यता नाकारता येत नाही.

इ. १९३० ते ४० या दहा वर्षांत आपणास प्रतिमास किती वेतन मिळते याचा विचार न करता सतत अभ्यास करीतच राहिलो आणि तोही इतिहासातील बहुविध अंगांचा. या कालात मला वेतनाखेरीज इतर पैसे अगदीच मिळाले नाहीत असे नाही. इ. १९३३ मध्ये कै. दत्तोपंत आपटे यांनी मुधोळच्या घोरपडे घराण्याचा इतिहास हे पुस्तक संपादित केले. त्यात मी १३३ पृष्ठांचा मजकूर लिहून दिला. त्याबद्दल मला १३३ रु. मिळाले. इ. १९३५ मध्ये Modern Indian History Congress च्या पहिल्या अधिवेशनाच्या निमित्ताने त्या अधिवेशनाचे स्वागताध्यक्ष भोरचे कै. राजा रघुनाथराव पंतसचिव यांजकडील दोन मुसलमान पूर्वकालीन ताम्रपट, नाणी, चित्रे, इत्यादींचे पुस्तक करून दिले. त्यासाठी मला भोरकरांनी पृष्ठास एक रु. याप्रमाणे पैसे दिले.

हे सर्व करीत असता मी व्यक्तिशः माझी म्हणून श्री क्षेत्र आळंदी, श्रीविठ्ठल आणि पंढरपूर आणि मूर्तिविज्ञान अशी तीन पुस्तके प्रकाशित केली. आळंदीचे पुस्तक येथील राजगुरू प्रेसने प्रसिद्ध केले. त्याबद्दल मला वीस रुपये आणि सवलतीच्या दराने काही प्रती मिळाल्या. श्रीविठ्ठल आणि पंढरपूर या पुस्तकाची एक गंमतच झाली. मुंबईच्या एका प्रकाशकाने त्या पुस्तकासाठी मला ५० रुपये दिले. पण नंतर त्यांनी मला सांगितले की, या पुस्तकास मी एक भक्तिरसप्रधान प्रकरण जोडतो. माझे पुस्तक संशोधनात्मक असल्याने असे करणे उचित नाही असे वाटून मी त्यांचे पैसे परत केले व स्वखर्चाने ते पुस्तक छापले. तेव्हापासून मी एक धडा घेतला तो हा की, आपण लिहिलेले पुस्तक शक्य तो आपणच प्रसिद्ध करावयाचे; त्यासाठी पैसे नसले तर भीक मागून पैसे उभे करावयाचे व नंतर पुस्तक छापावयाचे. या कालातील माझे तिसरे पुस्तक मूर्तिविज्ञान. या पुस्तकासाठी मी अचाट परिश्रम केले. त्यात २५० पृष्ठे मजकूर व ९३ चित्रे आहेत. हे पुस्तक प्रकाशित कराल का म्हणून मी पुण्यातील एका प्रकाशकाला विचारले. त्याने मी

अंदाज केला होता त्याच्या दीडपट खर्चाचा अंदाज दिला. ते पैसे पुस्तकविक्रीतून मी प्रथम काढून घेईन आणि नंतरच्या विक्रीतून येणाऱ्या पैशातून वाटणी करू असे सांगितले. ही त्या प्रकाशकाची उघड उघड लबाडी होती. इतर प्रकाशकांकडे न जाण्याचा विचार करण्यास हेही एक कारण होते. या पुस्तकाच्या प्रकाशनासाठी यशोदा-चिंतामणी निधीतून ३०० रुपये, इचलकरंजी निधीतून २०० रुपये व प्रवासखर्चासाठी २०० असे सातशे रुपये मला मिळाले. शिवाय त्या वेळचे केंद्रीय पुरातत्त्व विभागाचे महानिर्देशक कै. रा. ब. का. ना. दीक्षित यांनी माझ्या पुस्तकात घालता येतील असे व त्यांच्या विभागाकडे असलेले ४७ ब्लॉक्स विनामूल्य वापरण्यास दिले व पुस्तकास एक छोटी प्रस्तावनाही लिहून दिली. कै. बाळासाहेब पंतप्रतिनिधी यांनी काही पैसे द्यावेत असा प्रयत्न मी केला; पण तो अयशस्वी झाला. तथापि या पुस्तकाला शंकराजी नारायण पारितोषिक मिळाले व माझे पुस्तक प्रकाशित होते न होते एवढ्यात माझे सर्व पैसे बाहेर निघाले. या पुस्तकास आणखी काही पारितोषिके मिळाली. यामुळे पुस्तकाची किंमत कमी ठेवूनही ते पुस्तक मला फायद्यात पडले.

याही पुढे जाऊन गावोगाव हिंडून शिलालेख, ताम्रपट, कागदपत्र, इत्यादी मिळविण्याचा, त्यांचा अभ्यास करण्याचा आणि ती साधने प्रकाशित करण्याचा मी प्रयत्न केला. त्यासाठी मी त्या वेळच्या निजामी राज्यातील औरंगाबाद, बीड व उस्मानाबाद हे जिल्हे तसेच महाराष्ट्रातील जमतील तेवढे सर्व जिल्हे आणि कर्नाटकातील मुख्यत: बेळगाव व धारवाड, हे जिल्हे हिंडलो. मी या दोन जिल्ह्यांतील सुमारे साठ ठिकाणी जुन्या कागदपत्रांसाठी गेलो. त्यात काही खेडेगावेही होती. मला कानडी समजत होते, पण बोलता येत नव्हते. उलट मी ज्या घराण्यांतील लोकांना भेटलो त्यांना मराठी समजे, पण बोलता येत नसे. अशा स्थितीतही तिकडील लोकांनी कागदपत्र जमविण्याच्या माझ्या प्रयत्नाला चांगला प्रतिसाद दिला. मी फार लांबून, पण सद्‌भावनेने आलो आहे असे पाहून ज्यांच्याकडे जुने कागदपत्र होते त्या सर्वांनी मला आपुलकीने कागदपत्र दाखविले व प्रसिद्धीसाठी मला दिलेही. इतका उत्साहवर्धक अनुभव महाराष्ट्रातही निदान त्या वेळी तरी येत नसे. मुख्यत: या कागदपत्रांचे एक फार्सी व एक मराठी-कानडी असे दोन खंड मंडळाने पुढे प्रकाशित केले.

या कालात तयार केलेल्या शिवचरित्रवृत्तसंग्रहाच्या दोन खंडांविषयी एक माहिती सांगणे अनुभवाच्या दृष्टीने अतिशय आवश्यक आहे. ह्या दोन्ही खंडांचे काम मी मंडळ-कामाशिवाय फुरसतीच्या वेळी केले होते. त्या कामाला मी किती वेळ खर्च केला हे तारीखवार व समयवार टिपून ठेवले होते. त्याचे मला निराळे पैसे द्यावेत असे मी शिवचरित्रकार्यालयाला लिहून पाहिले. शिवचरित्रकार्यालयापाशी पैसे नव्हते अशी वस्तुस्थिती नव्हती. त्या वेळचे कार्यालयाचे प्रमुख कै. द. वि. आपटे यांची

तशी इच्छाही होती; पण तत्कालीन खजिनदार यांची कल्पना होती की, प्रत्येक मनुष्याने पैशाकडे न पाहता स्वार्थत्यागाने काम केले पाहिजे. त्यांची आमच्या पुढील आयुष्यापैकी उतारवयाच्या काळातील निर्वाहाची काहीच व्यवस्था नव्हती अशा मला त्यांचे म्हणणे कसे पटावे ? त्याविषयी बरीच वादावादी झाली; पण शेवटी त्याबद्दल मला एक दमडीही मिळाली नाही. एवढेच झाले की, जे काम पाचसात वर्षे पडून राहिले होते ते मंडळाने प्रसिद्ध केले.

येथे कै. द. वि. आपटे यांच्याविषयी चार शब्द लिहिणे अगदी आवश्यक आहे. त्यांच्याइतका सालस, समतोल विचार करणारा, दुसऱ्याविषयी कणव असणारा, ज्ञानपिपासू आणि प्रपंच असून पैशाविषयी निरिच्छ, राष्ट्रप्रेमी असा मनुष्य मी — माझा निकट सहवास ज्यांशी घडला त्यांत कै. बाबा कोल्हटकर यांशिवाय — अद्याप तरी दुसरा पाहिला नाही. राष्ट्रसेवेसाठी त्यांनी जे अमाप हाल सोसले व त्यांच्या कुटुंबियांनाही हाल सोसावे लागले त्यातून कदाचित त्यांचा हा स्वभाव तयार झाला असेल. त्यांच्यामध्ये भिडस्तपणा हा दोष अवश्य होता. त्या भिडस्तपणाला बळी पडून कधी कधी त्यांचे हातून तत्त्वशून्य वर्तन होत असे. ते वास्तविक पक्के असहकार वादी होते; पण डॉ. कै. सु. ना. सेन यांच्या भिडेला बळी पडून ते कलकत्ता विद्यापीठात एम् ए. चे परीक्षक झाले होते. मी शिवचरित्रवृत्तसंग्रहाची अडीचशेवर पृष्ठांची दोन पुस्तके खाजगी वेळात करूनही त्यात मला एका पैशाचीही प्राप्ती न होण्यास त्यांचा हा भिडस्त स्वभाव कारणीभूत झाला; खजिनदारासमोर ते ठासून बोलले नाहीत अशी माझी कल्पना.

याच दहा वर्षांत मी आणखी एक उपक्रम केला. इ. १९३५ सालापासून रेल्वेने अल्पमूल्यात झोन व राउंड टूर तिकिटे काढण्याची पद्धत सुरू केली. ती इ. १९४२ पर्यंत चालली. त्याचा लाभ घेऊन मी इ. १९३५ ते ४२ या सात वर्षांत सिंध, पूर्व-बंगाल, नेपाळ, भूतान एवढे प्रांत वगळून साऱ्या भारतभर अभ्यास करण्यासाठी हिंडलो. त्यात पेशावर ते कन्याकुमारी आणि जयपूर, जोधपूर ते कलकत्ता हा सर्व भाग हिंडून उत्खननक्षेत्रे, संग्रहालये आणि ग्रंथालये पाहिली. प्रत्येक ठिकाणी जाऊन अभ्यासाची टिपणे केली. त्या टिपणांचा मला अजूनही उपयोग होतो. या प्रवासाने अनेक विद्वान लोकांचा साक्षात परिचय हाही एक महत्त्वाचा लाभ झाला आणि तो आजही टिकून आहे. त्यांपैकी काही इहलोक सोडून गेले. पण त्यांच्या स्मृती अजून ताज्या आहेत. त्यांपैकी दोन चार नावे सांगतो. डॉ. शिवराममूर्ती, कै. रा. ब. का. ना. दीक्षित, कै. डॉ. वासुदेवशरण आगरवाल, कै. राय कृष्णादास, कै. महामहोपाध्याय पां. वा. काणे, ओ. सी. गांगुली, पर्सी ब्राऊन इ. माझ्या पुस्तकांतून मला जे पैसे मिळाले त्यांतूनच भारताचा दौरा मी मुख्यतः केला या प्रवासासाठी मंडळ पैसे देऊ शकत नव्हते. तरी मंडळाने एक चांगली गोष्ट केली. ती म्हणजे हा प्रवास करण्यामध्ये अडथळे न आणता प्रोत्साहनच दिले व माझा प्रवास ही सेवाच धरली.

हा प्रवास मुख्यतः मला मिळालेल्या पैशातूनच झाला असला तरी भारतभर प्रवास करता येईल एवढे पैसे मजपाशी नव्हते. म्हणून पुणे व मुंबई येथील नियतकालिकांत लेख देऊन त्यांचे कडून पैसे घ्यावयाचे असे करारही मी काही वेळा केले.

माझ्या वयाला अडतीस वर्षे होईतो मला सायकलवर बसता येत नव्हते. यामुळे ग्रंथावलोकनासाठी निरनिराळ्या संस्थांत जाण्यायेण्याकरिता पायपिटी करावी लागे. तीमुळे वेळ व श्रम अधिक होत. तेव्हा सायकल चालविण्यास शिकलो व मग विविध संस्थांच्या वाऱ्या करू लागलो.

१९३७–४० च्या सुमारास मंडळात प्रा. त्र्यं. शं. शेजवलकर रहात होते. त्यांना जगातल्या नको त्या विषयांवर गप्पा मारण्याची सवय होती. मी माझे निर्वाहाचे काम करीत असता किंवा अभ्यास करीत असता ते मजकडे गप्पा ठोकण्यासाठी येत. मी त्यांच्याकडे लक्ष न देता आपले काम खाली मान घालून करू लागलो की रागावत. याबद्दल त्यांनी कै. पोतदारांकडे तक्रारही केली होती.

संशोधनातला माझा एक तापदायक अनुभव अवश्य लक्षात ठेवण्यासारखा आहे. अनेक ठिकाणी जुने कागद, पत्रं, पोथ्या वगैरे सामग्री अशा तऱ्हेने पडून असते की, ती कित्येक वर्षांचा धुरळा, केरकचरा, कोळिष्टके, जळमटे इत्यादींनी व्याप्त असते. ती सामग्री साफसूफ करताना संशोधकाच्या नाकातोंडात इतका खाकाणा जातो की मला तरी त्यामुळे अनेकदा ताप व पडसे यांनी बेजार व्हावे लागले आहे. पण केवळ संशोधनाच्या आस्थेनेच मी ते सहन केले व इतरांनाही सहन करावे लागले व लागत असेल.